**वन्यप्राण्यांच्या हल्ल्यामध्ये होणा-या मनुष्य हानीबाबत नुकसानग्रतांना तात्काळ आर्थिक मदत करण्याकरिता राखीव निधी ठेवणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसुल व वन विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक : डब्ल्यूएलपी-०५२३/प्र.क्र.१६९/फ-१**
मंत्रालय, मुंबई, ४०० ०३२
दिनांक:- २३ जून, २०२३.

<u>प्रस्तावना :-</u>

वन्यप्राण्यांमुळे झालेल्या हल्ल्यांच्या बाबतीत तत्काळ नुकसान भरपाई अदा करण्याकरिता राज्य शासनाने सन २०२३-२४ करीता अर्थसंकल्पित केलेली संपूर्ण तरतूद रु. ७०००.०० लक्ष अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर वितरित केली आहे. सदर वितरीत अनुदानामधून वन्यप्राण्यांच्या हल्ल्यामध्ये होणा-या मनुष्य हानीकरिता तात्काळ आर्थिक नुकसान भरपाई अदा करण्याकरिता क्षेत्रीय स्तरावर कायमस्वरुपी राखीव निधीची तरतूद करण्याची करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन परिपत्रक :-**

वन्यप्राण्यांच्या हल्ल्यामध्ये होणा-या मनुष्य हानीकरिता तात्काळ आर्थिक नुकसान भरपाई अदा करण्याकरिता खालीलप्रमाणे तरतूद करण्यात यावी:-

१) वन्यप्राण्यांच्या हल्ल्यामध्ये होणा-या मनुष्य हानीकरिता तात्काळ आर्थिक नुकसान भरपाई अदा करण्याकरिता क्षेत्रीय स्तरावर कायमस्वरुपी राखीव निधीची (Reserve Fund) तरतूद करण्यात यावी.

२) सदर राखीव निधी वनवृत्तनिहाय मुख्य वनसंरक्षक/वनसंरक्षक यांच्या कार्यालयास मागील कालावधीमध्ये वनवृत्तामध्ये घडलेल्या मनुष्यहानीच्या घटनांची संख्या विचारात घेऊन किमान रु. २५.०० लक्ष ते कमाल १००.०० लक्ष च्या मर्यादेमध्ये निश्चित करण्याची जबाबदारी प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांची राहील.

३) मुख्य वनसंरक्षक / वनसंरक्षक यांनी वन्य प्राण्यांच्या हल्ल्यामध्ये होणा-या मनुष्यहानीच्या प्रकरणांमध्ये सदर राखीव निधीमधून नुकसानग्रस्तांच्या वारसांना प्रचलित नियमांनुसार अनुज्ञेय असलेली आर्थिक नुकसान भरपाई तात्काळ अदा करावी व राखीव निधीमधून खर्च झालेली रक्कम पूर्ववत करण्याकरिता निधीची मागणी प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचेकडे करावी. सदर राखीव निधी माहे फेब्रुवारी अखेरपर्यंत राखीव ठेवावा. तद्नंतर सदर निधी अन्य प्रकरणांमध्ये नुकसानभरपाई अदा करण्याकरिता वापरता येऊ शकेल.

४) सदर राखीव निधीमधून मनुष्यहानीची प्रकरणे वगळता अन्य प्रकरणांमध्ये नुकसान भरपाई अदा होणार नाही याची जबाबदारी संबंधित मुख्य वनसंरक्षक / वनसंरक्षक यांची राहील.

२. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२३०६२३१६४११९३२१९ असा आहे. हे शासन परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SIDDESH TUKARAM SAWARDEKAR

Digitally signed by SIDDESH TUKARAM SAWARDEKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, 2.5.4.20=7dc40890d791d1b1e6bae88da52eabb63f1f3ab6258c7e318f8c37f3ae7c36f2, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5712CE2D7A095C22E97EBB8F03C668B12EBA1DB0DD8E284883B7BD7FA74DA65D, cn=SIDDESH TUKARAM SAWARDEKAR
Date: 2023.06.23 16:43:17 +05'30'

**( सिध्देश सावर्डेकर )**
विशेष कार्य अधिकारी
महसूल व वन विभाग

**प्रति,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
२. मा. मंत्री (वने) यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
३. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
४. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
५. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
७. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
८. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
९. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), पश्चिम, मुंबई / पूर्व, नागपूर.
१०.विभागीय आयुक्त (सर्व)
११.मुख्य वनसंरक्षक / वनसंरक्षक (प्रादेशिक/वन्यजीव)
१२.मुख्य वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, मेळघाट व्याघ्र प्रकल्प, अमरावती
१३.वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, व्याघ्र प्रकल्प (सर्व)
१४.जिल्हाधिकारी (सर्व)
१५.उप वनसंरक्षक (प्रादेशिक / वन्यजीव) (सर्व)
१६.विभागीय वन अधिकारी (सर्व)
१७.महालेखापाल-१/२ (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
१८. वित्त विभाग ( व्यय-१० कार्यासन ), मंत्रालय, मुंबई.
१९.फ १-कार्यासन, महसूल व वनविभाग, मंत्रालय, मुंबई-३२ ( निवडनस्ती ).

*****